**कोषागारातून रोखीने देय**
**आदेश क्रमांक-१**

सन २०११-१२ मधील केंद्र शासनाने वितरीत केलेल्या निधीस अनुरुप राज्य हिस्सा (एस.सी.पी.) निधी वितरीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन,**
ग्रामविकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक इंआयो २०११/प्र.क्र.२९६/ योजना-१०
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२, दि. ९ नोव्हेंबर,२०११.

वाचा: १ केंद्र शासनाचे इंग्रजी पत्र क्र. DO # G-200111/2010/1/2010-RH,(P)-Dated-5th April,2010..

२ शासन निर्णय क्रमांक इंआयो २०१०/प्र.क्र.१२८/ योजना-१०, दि. २ जुलै, २०१०.

**प्रस्तावना :-**

१. केंद्र शासनाने संदर्भ क्र.१ येथील दि.०५.०४.२०१० च्या पत्रान्वये वर्ष २०१०-११ पासून घरकुलाच्या अनुदानात वाढ करुन ती रु.४५०००/- (रु.पंचेचाळीस हजार फक्त) अशी केली असुन त्या अनुषंगाने राज्यशासनाने उपरोक्त क्र. २ येथील शासन निर्णय दि.०२.०७.२०१० च्याअन्वये राज्य हिस्सा (२५%) रु.११२५०/- अधिक राज्याचा अतिरिक्त हिस्सा म्हणून रु.२३५००/ असे अनुदान निश्चित केले आहे.

२. केंद्र शासनाने सन २०११-१२ करिता पहिल्या हप्त्यामध्ये वितरित केलेल्या अनुदानाच्या अनुषंगाने राज्याचा समरुप हिस्सा सन २०११-१२ मधील मंजूर करण्यात आलेल्या घरकुलांसाठी वितरीत करावयाचा आहे. तद्नुसार वर्ष २०११-१२ मधील मंजुर केलेल्या नवीन घरकुलासाठी केंद्र शासनाकडून प्राप्त निधीचा समरुप राज्य हिस्सा तसेच राज्याचा अतिरिक्त हिस्सा वितरीत करावयाचा आहे.

३. राज्य शासनाच्या सामाजिक न्याय विभागाने इंदिरा आवास योजनेकरीता २०११-२०१२ या चालू वित्तीय वर्षासाठी जिल्हानिहाय व लेखा शिर्षनिहाय उपलब्ध केलेल्या तरतूदींच्या अधीन राहून राज्य हिश्श्यापोटी विशेष घटक योजनेंतर्गत देय असणारा (पहिला हप्ता) **रुपये ८०,१३,९०,०००/-(रु.ऐशी कोटी तेरा लक्ष नव्वद हजार फक्त)** निधी राज्यातील **तीस** जिल्हयांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०११-१२ या वित्तीय वर्षासाठी केंद्रपुरस्कृत इंदिरा आवास योजनेसाठी सोबत जोडलेल्या विवरणपत्र "अ" नुसार ग्राम विकास व जलसंधारण विभागाने विशेष घटक योजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून **रुपये ८०,१३,९०,०००/-(रु.ऐशी कोटी तेरा लक्ष नव्वद हजार फक्त)** इतका निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी देत आहे.

२.		विवरणपत्र "अ" मध्ये लेखाशिर्षातंर्गत जिल्हानिहाय खाली दर्शविल्याप्रमाणे रकमा संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्याकडे शासन सुपूर्द करीत असून, त्या संबंधित जिल्हयाच्या कोषागारातून तात्काळ रोखीने काढण्यास शासन मंजूरी देत आहे. सदर खर्च खाली दर्शविलेल्या अर्थसंकल्पीय लेखाशीर्षाखालील सन २०११-१२ च्या उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

( रुपये लाखांत )

| विवरणपत्र | अर्थसंकल्पिय लेखाशीर्ष व संकेतांक क्रमांक | वितरीत करण्यात आलेली एकूण रक्कम | |
|---|---|---|---|
| | | अंकी | अक्षरात |
| जोडपत्र "अ" (एस.सी.पी.) | मागणी क्रमांक एल-०३ २५०५ ग्रामीण सेवा योजन ६० इतर कार्यक्रम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (एक)-इंदिरा आवास योजना (दोन) विशेष घटक योजना इंदिरा आवास योजना इंदिरा आवास योजनेअंतर्गत खर्च भागविण्यासाठी जिल्हा ग्रामीण विकास अभिकरण/जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५०५०५७-७) | ८०१३.९० | रु. ऐंशी कोटी तेरा लक्ष नव्वद हजार फक्त |

३.		जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांनी सदरहू निधी मिळाल्यानंतर हा निधी संबंधित यंत्रणांना / पंचायत समित्यांना एक दिवसांच्या आत वितरीत करावा. यंत्रणांना/अधिका-यांना वितरीत केलेल्या निधीच्या आदेशाची एक प्रत न चुकता या विभागास पृष्ठांकित करावी. वितरीत निधी योजनाबध्द नियोजन करुन खर्च करावा. तसेच आपल्या यंत्रणेस एकूण प्राप्त हप्ता व अखर्चित निधी मिळून जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेकडे एकूण उपलब्ध निधीमधून **माहे मार्च, २०१२ अखेर पर्यंत १०० टक्के खर्च होईल**, याची खबरदारी घ्यावी.

४.		येथे असेही नमूद करण्यात येते की हा निधी जिल्हा वार्षिक योजना ( सामान्य ) या बाबत मागणी क्र.एल ०३, २५०५ ग्रामीण सेवा योजना ६० इतर कार्यक्रम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (एक) इंदिरा आवास योजना इंदिरा आवास योजनेअंतर्गत खर्च भागविण्यासाठी जिल्हा ग्रामीण विकास / जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५०५०५७७)या लेखाशिर्षाखालील निधी जिल्हाधिकारी यांचेकडून संबधीत जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांना वितरीत केला जाणार आहे.

५.		हा शासन निर्णय (१) वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३४५/२०११/व्यय-१५ ,दिनांक १८.१० २०११ तसेच अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६९०/२०११/अर्थ-१७ दिनांक १.११.२०११ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने आणि **योजनेच्या सन २०११-१२ च्या अर्थसंकल्पिय तरतूदीचे मासिक विवरण पत्र (MonthlyCash Flow) यास अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे**.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा **संगणक संकेतांक २०११११०९१४४४५२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( र.ह.श्रावणपाटील )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत:-**

१) मा. मंत्री ग्राम विकास यांचे सचिव
२) सर्व विभागीय आयुक्त
३) सर्व जिल्हाधिकारी.
४) वित्त विभाग, कार्यासन क्रमांक व्यय-१५ व अर्थसंकल्प ३ व १७
५) आदिवासी विकास विभाग, कार्यासन क्रमांक ७, १२,मंत्रालय, मुंबई-४०००३२
६) नियोजन विभाग,,मंत्रालय, मुंबई-४०००३२
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
९) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखापरिक्षा), मुंबई
१०) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखापरिक्षा) नागपूर
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा ( संबधित ३३ जिल्हे )
१२) प्रकल्प संचालक , जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा ( संबधित ३३ जिल्हे )
१३) जिल्हा कोषागार अधिकारी ( संबधित ३३ जिल्हे )
१४) अप्पर संचालक,एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष,पे ॲन्ड अकौंटस कॉम्प्लेक्स बॅरेकनं.१४ मुंबई -२१ ( ५ जादा प्रतीसह )
१५) कक्ष अधिकारी, कार्यासन क्रमांक वित्त -१ ( ग्रामविकास )
१७) निवडनस्ती ( कार्यासन क्रमांक योजना-१० ).

## विवरणपत्र अ

इंआयो -२०११/ प्र. क्र.२९६ / योजना-१०, दि. ९ नोव्हेंबर, २०११ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२

### विशेष घटक योजना (एस.सी.पी)

| अ.क्र. | जिल्हा | प्रत्यक्ष करावयाचे वितरण रुपये (अंकात) | प्रत्यक्ष करावयाचे वितरण रुपये (अक्षरी) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ठाणे | ३५०००.०० | रुपये पस्तीस हजार फक्त |
| २ | रायगड | १३१०४०००.०० | रुपये एक कोटी एकतीस लक्ष चार हजार फक्त |
| ३ | रत्नागिरी | ६२५५०००.०० | रुपये बासष्ठ लक्ष पंचावन्न हजार फक्त |
| ४ | सिंधुदुर्ग | १६७३०००.०० | रुपये सोळा लक्ष त्र्याहत्तर हजार फक्त |
| ५ | धुळे | १२६५००००.०० | रुपये एक कोटी सव्वीस लक्ष पन्नास हजार फक्त |
| ६ | जळगांव | ४६१३५०००.०० | रुपये चार कोटी एकसष्ठ लक्ष पसत्तीस हजार फक्त |
| ७ | अहमदनगर | ६०१९२०००.०० | रुपये सहा कोटी एक लक्ष ब्याण्णव हजार फक्त |
| ८ | पुणे | ७२५२२०००.०० | रुपये सात कोटी पंचवीस लक्ष बावीस हजार फक्त |
| ९ | सातारा | ३२२६७०००.०० | रुपये तीन कोटी बावीस लक्ष सदुसष्ठ हजार फक्त |
| १० | सांगली | १००००००.०० | रुपये एक कोटी हजार फक्त |
| ११ | सोलापूर | ५०६४३०००.०० | रुपये पाच कोटी सहा लक्ष त्रैचाळीस हजार फक्त |
| १२ | कोल्हापूर | ८१८७०००.०० | रुपये एक्याऐंशी लक्ष सत्त्याऐंशी हजार फक्त |
| १३ | औरंगाबाद | ३८००००००.०० | रुपये तीन कोटी ऐंशी लक्ष फक्त |
| १४ | जालना | ९७०००००.०० | रुपये सत्त्याण्णव लक्ष फक्त |
| १५ | परभणी | १३५०००००.०० | रुपये एक कोटी पसतीस लक्ष फक्त |
| १६ | हिंगोली | २६२२४०००.०० | रुपये दोन कोटी बासष्ठ लक्ष चोवीस हजार फक्त |
| १७ | बीड | १५००००००.०० | रुपये एक कोटी पन्नास लक्ष फक्त |
| १८ | नांदेड | ९०१०००००.०० | रुपये नऊ कोटी एकलक्ष फक्त |
| १९ | उस्मानाबाद | २५०३८०००.०० | रुपये दोन कोटी पन्नास लक्ष अडतीस हजार फक्त |
| २० | लातूर | ७२३३७०००.०० | रुपये सात कोटी तेवीस लक्ष सदतीस हजार फक्त |
| २१ | बुलढाणा | १६८२७०००.०० | रुपये एक कोटी अडुसष्ट लक्ष सत्तावीस हजार फक्त |
| २२ | अकोला | २५२६६०००.०० | रुपये दोन कोटी बावन्न सहासष्ठ हजार फक्त |
| २३ | वाशिम | १५९२६०००.०० | रुपये एक कोटी एकोणसाठ लक्ष सव्वीस हजार फक्त |
| २४ | अमरावती | १४००००००.०० | रुपये एक कोटी चाळीस लक्ष फक्त |
| २५ | यवतमाळ | ३९०३२०००.०० | रुपये तीन कोटी नव्वद लक्ष बत्तीस हजार फक्त |
| २६ | वर्धा | २०३८७०००.०० | रुपये दोन कोटी तीन लक्ष सत्त्याऐंशी हजार फक्त |
| २७ | नागपूर | ३१७१४०००.०० | रुपये तीन कोटी सतरा लक्ष चौदा हजार फक्त |
| २८ | भंडारा | ४९०३०००.०० | रुपये एकोणपन्नास लक्ष तीन हजार फक्त |
| २९ | गोंदिया | १००८२०००.०० | रुपये एक कोटी ब्याऐंशी हजार फक्त |
| ३० | चंद्रपुर | १९६९१०००.०० | रुपये एक कोटी शहाण्णव लक्ष ऐक्याण्णव हजार फक्त |
| **एकुण** | | **८०१३९००००.००** | **रुपये ऐंशी कोटी तेरा लक्ष नव्वद हजार फक्त** |